चंद्रपूर जिल्हा कारागृह येथे चार अतिरिक्त बरॅकी बांधण्यासाठी खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
गृह विभाग
शासन निर्णय क्र. बीएलडी २००४/प्र.क्र.१८/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-३२, दि. १६ मार्च, २००४

पहा :- कारागृह महानिरिक्षक , महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. बीएलडी / २१९५ / ४७५ / ५८९ / कक्ष-३, दि. २१.१.२००४.

शासन निर्णय :- चंद्रपूर जिल्हा कारागृहाची अधिकृत बंदी क्षमता १५३ असून सध्या तेथे दररोज सरासरी बंदी संख्या ५०० ते ५५० दरम्यान असते. त्यामुळे कारागृहात बेसुमार गर्दी झालेली असून बंद्यांना पुरेशी जागा मिळत नाही. याचा परिणाम बंद्यांना देण्यात येणाऱ्या सोयीसुविधा व कारागृह प्रशासनावर होत आहे. या संदर्भात मा. मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांनी राज्यशासनाने बंद्यांना पुरेशी जागा उपलब्ध करुन देण्याबाबत निर्देशही दिले आहेत त्या अनुषंगाने चंद्रपूर जिल्हा कारागृहात चार अतिरिक्त बरॅकी बांधण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता व त्यासाठी सदर बांधकाम करण्यासाठी सहाय्यक अभियंता (वर्ग-१), सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र. २, चंद्रपूर, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र-२, चंद्रपूर आणि अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर यांनी स्वाक्षांकित केलेले रु. १,०७,४१,६००/- इतक्या रकमेच्या खर्चाचे अंदाजपत्रक व नकाशे प्रशासकीय मान्यतेसाठी उक्त संदर्भाधिन पत्रान्वये कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास सादर केले आहेत.

२. उपरोक्त बांधकानाच्या अंदाजपत्रकात दर्शविलेला एकुण खर्च रुपये १,०७,४१,६००/- इतका असून सदर बांधकाम कारागृहाच्या आवारातीलच मोकळ्या जागेत करावयाचे असल्याने बरॅकीच्या बांधकामाच्या प्रस्तावातील रु. १,०७,४१,६००/- खर्चाच्या पृथःकरणात केलेली १५% अधिक तरतूद आकस्मिक खर्च, संगणीकीकरणासाठी, विद्युतीकरणासाठी व बाह्य आणि आंतर पाणीपुरवठा व स्वच्छतेसाठी सुचविलेली तरतूद रद्द करुन सुधारीत रुपये ९३,४०,४८१/- इतक्या रकमेच्या खर्चास/अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभाग व वित्त विभागाने सहमती दर्शविली आहे.

३. चंद्रपूर जिल्हा कारागृह येथे बंद्यासाठी ४ अतिरिक्त बरॅकी बांधण्याच्या खर्चाचा समावेश केंद्रपुरस्कृत कारागृह सुधारणा योजनाच्या सन २००२-०३ ते २००५-०६ च्या आराखड्यात केलेला असून, त्यानुषंगाने विभागाने "२०५६, तुरुंग, १०१-तुरुंग, (००) (०९) कारागृह सुधारणा योजना (केंद्रपुरस्कृत) (योजनेतर) (२०५६-०१८९)" या

लेखाशिर्षाखाली सदर खर्चाची तरतूद सन २००३-२००४ च्या आर्थिक वर्षात केलेली आहे. उपरोक्त वस्तुस्थिती, कारागृहाची सुरक्षितता, कामाची निकड व त्यामुळे बंद्याच्या सोयीसुविधेत होणारी वाढ, तसेच मा. उच्च न्यायालयाने दिलेले निर्देश या बाबी लक्षात घेता चंद्रपूर जिल्हा कारागृह येथे बंद्यांसाठी ४ अतिरिक्त बरॅकी बांधण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीन्वये येणाऱ्या रुपये ९३,४०,४८१/- (रुपये त्र्याण्णव लाख चाळीस हजार चारशे एक्याऐंशी फक्त) एवढ्या रकमेच्या खर्चाच्या अंदाजपत्रक व नकाशास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देत आहे.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. बी-५, मुख्य लेखाशीर्ष "२०५६, तुरुंग, १०१-तुरुंग, (००) (०९) कारागृह सुधारणा योजना (केंद्रपुरस्कृत) (योजनेतर) (२०५६-०१८९)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन सन २००३-२००४ च्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा, व खर्चाची माहिती केंद्रशासनास पाठविण्यासाठी विहित विवरणपत्रात भरुन शासनास सादर करावी.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. सीआर १७९/०४/व्यय-८, दि. ३.०३.२००४ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(र. ना. माळी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रत.

- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक, पूर्व विभाग, नागपूर
- अधिक्षक, चंद्रपूर जिल्हा कारागृह, चंद्रपूर.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व परिक्षा) मुंबई / नागपूर.
- जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर
- सहाय्यक अभियंता (वर्ग-१), सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र-२, चंद्रपूर.
- कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र-२, चंद्रपूर.
- अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर.
- सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
- वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई-३२.
- अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- निवड नस्ती, पीआरएस-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

D:\Yogesh\2004\March\Prs-2.05